जय गणेश आज विनायकी चतुर्थी

मोहासुर विनाशक श्री महोदर विनायक

कधीकाळी तारकासुर नामक एक भयावह राक्षस जन्माला आला. त्याने भगवान श्री ब्रह्मदेवांची कठोरतम तपश्र्चर्या केली. पितामह प्रकट झाले. याने वरदान मागितले की मला मृत्यू नसावा. श्री ब्रह्मदेव म्हणतात की हे संभवच नाही. जर मलाच अंत आहे तर मी तुला अनंत कसे करू शकेल? हा फार तर मृत्यू कसा असावा ते मग. ते देता येईल.

तारकासुर विचारात पडला. नेमक्या याच संधीचा लाभ घेण्यासाठी देवर्षी नारद तेथे उपस्थित झाले. त्यांनी तारकासुरास उपाय सांगितला. भगवान शंकरांची पत्नी देवी सती दक्षयज्ञात भस्म झाली आहे. शंकरांना बायकोच नाही. मग पुत्र होण्याचा प्रश्नच नाही. तू शिवपुत्राच्या हातून मृत्यू माग म्हणजे तू अमरच होशील.

देवर्षींच्या दूरदृष्टीची अत्यल्पही जाणीव नसलेला राक्षस या जाळ्यात बरोबर फसला. त्याने ब्रह्मदेवांना तसेच वरदान मागितले. ब्रह्मदेव म्हणाले 'तथास्तु!' आपण अमर झालो या आनंदात तारकासुर निघाला आणि त्याच्या तपश्र्चर्येच्या परिणाम वशात शिवविवाहाची बीजे रोवल्याच्या आनंदात देवर्षी नारद गमन करते झाले. नियतीच्या चक्राने वेगळी गती घेतली.

तारकासुराने जगताला, त्रैलोक्याला त्राही त्राही करण्यास भाग पाडले. सगळ जग जिंकले. देवताही वनवासी झाल्या. पण तारकासुर विनाशाचा उपायच हाती लागेना. प्रत्यक्ष शंकरांनाही प्रार्थना करून उपयोग नव्हता कारण प्रश्नाचे समाधान होते -'शिवपुत्र'.

देवतांची ही समस्या सोडविण्याचे कार्य देखील देवर्षी नारदांनीच केले. त्यांनी देवतांना सांगितले की पूर्वजन्मीची सतीच या जन्मात हिमाचल कन्या पार्वती रुपात अवतरीत झाली आहे. हा आशेचा किरण दिसताच सगळया देवता हिमाचलाकडे आल्या. आईसाहेबांच्या नविनरूपाचे दर्शनाने धन्य झाल्या.

सगळयांनी त्यांना अवतार कार्यार्थ प्रार्थना केली. पण प्रश्न वेगळाच होता. भगवान श्री भोलेनाथ अथांग समाधीत गढून गेले होते. त्यांना देहभानावर आणल्या शिवाय ना विवाह संभव होता ना संतती.

हे कार्य करणार कसे? शेवटी सगळयांनी मिळून ही जबाबदारी भगवान मदनांवर सोपविली. श्री कामदेव आपला सखा वसंतासह कामगिरीवर लागले. भिल्लीणीच्या वेषात देवी पार्वतीला समोर ठेऊन श्री मदनांनी अमोघ बाणाचा प्रहार केला.

नेमका परिणाम घडला. भगवान योगनिद्रेतून बाहेर आले. समोर दिसली देवी पार्वती. त्या अतुलनीय रूपाचा परिणाम झाला आणि योगीराज राजेश्वर श्री भोलेनाथही पाघळले. प्रदीर्घ काळापासून संचित भावनांना अचानक उधान आले आणि श्रीशंकर स्खलित झाले.

नंतरच्या काळात शिवनेत्राग्नीने मदनदाह शिवपार्वती विवाह देवसेनापती स्कंदांचा जन्म आणि त्यांच्याद्वारे तारकासुर वध

. सर्वज्ञात भाग यथारूप पार पडला.

मात्र देवी पार्वतीच्या प्रथम दर्शन समयी पतित झालेले शिववीर्य व्यर्थ कसे जाणार? त्यापासून एक भयावहकाय राक्षस जन्माला आला. श्रीशिवांना पार्वतीरूपाच्या झालेल्या मोहाच्या परिणाम रुपात प्रगटलेला तो राक्षस इतिहासात मोहासुर नावाने ओळखला गेला.

मोहासुराचे पालकत्व जृंभासूर नामक राक्षसाने स्वीकारले. श्रीशुक्राचार्यांचे शिष्यत्व घेतलेल्या मोहासुराने प्रारंभिक साधना केली.

जृंभासुराच्या मनात आता त्याच्या विवाहाचे विचार आले. प्रमदासुर नामक राक्षसाची 'मदिरा' नामक कन्या मोहासुरपत्नी झाली. तिच्या पासून मोहासुरास उग्र, क्रूर, मेधावी, शोधन आणि हरण नामक पाच पुत्र झाले. संसारातील सर्वसुखे मोहासुरासमोर हात जोडून उभी होती. पण अशा चाकोरीबद्ध संसारासाठी मोहासुर जन्मालाच आला नव्हता. त्याला विश्वविजयाची स्वप्ने पडू लागली. शेवटी तो विचार प्रवाह अतिप्रबल झाला आणि सगळयांना बोलावून आपला विचार सांगितला आणि मोहासुर महातपस्येकरिता गहन वनांतरी प्रवेशला.

श्री शुक्राचार्यांचे कथन होते कोणतीही महान गोष्ट करायची तर सर्वप्रथम हवे सदृढ, आरोग्यसंपन्न शरीर 'आरोग्यं भास्करादिच्छेत!' अर्थात आरोग्य श्रीसूर्य नारायणांकडून प्राप्त होते. अत: मोहासुर श्रीसुर्योपासनारत झाला. अखंड सूर्योपासना  सुरु होती तोवर श्री सूर्य प्रकट झाले नाही.

अनेकानेक वरदान संपन्न झालेला मोहासुर परतला. श्रीगुरू शुक्राचार्यांनी राज्याभिषेक केला आणि राक्षसराज मोहासुर त्रिभुवन विजयार्थ सज्ज झाला. अर्थात विजय हा केवळ औपचारिकतेचाच भाग होता त्याच्या वरदान प्राप्त बलासमोर टिकण्याची क्षमता आता पंचेश्वरांमध्येही नव्हती. कारण वरदानच होते की 'नामरूपात्मक कशानेही मृत्यू व पराभवही नसावा?

भारत वर्षातील एका निबिड अरण्यात वनवासी झालेल्या देवतांची मोहासुर विनाशोपायार्थ बैठक झाली. मात्र उपाय कोणाच्याच जवळ नव्हता. शेवटी सगळयांनी श्री सुर्यांनाच विनंती केली की तुम्हीच वरदाने दिली आता तुम्हीच मार्ग सांगा.

श्री सूर्यांनी देवतांना कर्मसिद्धांत सांगण्यास आरंभ केला. ते म्हणाले आज मोहासुर अजेय आहे कारण त्याची पूर्व कर्मे. आपणही असे निर्वासित आहोत कारण आपली पूर्व कर्मे. ज्यावेळी आपण सत्तेत असतो त्यावेळी ती सत्ता ज्याच्या कृपेने लाभली त्या गणनाथास विसरतो. आपापल्या स्वर्गीय भोगात रमतो अत: पदच्युत होतो. त्या काळात राक्षसाने तप केले. पुण्य कमावले त्याचे फळ तो आता  भोगत आहे. त्याचे पुण्यफल संपण्याची वाटच पाहावी लागेल आणि तोपर्यंत आपले पुण्यबल वृद्धिंगत करावे लागेल. तरच लाभ होईल. दुसरी बाब म्हणजे त्याला वरदान आहे की नामरूपात्मक कशानेही त्याला भय नाही आणि नामरुपातीत तत्व आहे एकटे श्री गणराज प्रभू. अत: त्यांना शरण जाण्याशिवाय अन्य पर्यायच नाही.

श्री सूर्यांच्या कथनाला सगळयांनी मान्यता दिली आणि परिणाम रुपात सगळ श्रीगणेशोपासनेत रममाण झाले. सगळयांची तपस्या फळाला आली आणि भगवान श्री स्वानंदनाथ मोहासुर विनाशक श्री महोदर रुपात प्रकट झाले.

श्रींनी मोहासुरास समजावण्यासाठी प्रथम देवर्षी नारदांना पाठविले. नारदांनी त्यास गणराज अवतरणाबाबत सांगितले आणि शरण येण्यास सांगितले. त्यानंतर नारदोपदेशाने भारावलेल्या मोहासुरास पूर्ण नि:संशय करण्यासाठी श्रींनी श्रीविष्णूंना पाठविले.

श्रीहरींनी त्याला महोदरत्वाचे रहस्य समजावून सांगितले. नामरूपातीत स्वानंदनाथ केवळ लीलारुपात आज महोदर झाला असला तरी ते निर्गुण निराकार परब्रह्मच कसे आहे हे समजलेला मोहासुर श्रीगणराज चरणी शरण आला.

ज्या सहजतेने त्याने ब्रह्मांड जिंकले होते त्याच सहजतेने भगवंतांनी त्याला सकल त्यागास प्रवृत्त केले आणि मग आपल्या गणांमध्ये स्थान दिले.

ही महोदर अवताराची श्री मुदगल पुराणाच्या तृतीय खंडातील कथा. हा शंकरांपासून कसा जन्माला येतो? मदिरेसोबतच कां विवाह करतो? श्रीसूर्य कर्ममार्गच कां सांगतात? महोदरत्वाचे रहस्य काय? मोहासुराचा विनाश महोदर कसे करतात?

. रहस्याचा विचार नेहमी प्रमाणे कृष्णचतुर्थीस पाहू. तोवर जय गजानन!

जय गणेश!

अधिक माहिती करता संपर्क
स्वानंदशास्त्री गजानन पुंड
ईमेल: sgpund@rediffmail.com
For More Details Visit Our Website: www.dagdushethganpati.com